केंद्र शासनाच्या " **स्वच्छ भारत मिशन ( ग्रामीण )** " कार्यक्रमांतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता प्राप्त केंद्रीय सहाय्य वितरीत करण्याबाबत. **( २२१५ ९८६२ )**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६ / प्र.क्र. ०६ / कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीखः - ०३ फेब्रुवारी, २०१७.

<u>वाचा -</u>

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६ /प्र.क्र.८९ / अर्थ-३, दि. २०.०४.२०१६.
२) वि. वि,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६.
३) केंद्र शासन, पेय जल व स्वच्छता मंत्रालय यांचे क्र. S.12011 / 07 / 2015 - SBM , दि. ०१-१२-२०१६.
४) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, समक्रमांक दि. २१-०७-२०१६.
५) पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाची नस्ती क्र.स्वभामि- १२१६ / प्र.क्र. ४१ /पा.पु.१६.

**शासन निर्णय :-**

आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-५, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता, जनजाती क्षेत्र उपयोजना, जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना, (०२) जलनिस्सारण व स्वच्छता, ७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) स्वच्छ भारत अभियानांतर्गत वैयक्तिक स्वच्छालय बांधणे २२१५ ९८६२ मधील ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर), या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षात रु. २५४७२.०७ लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे.

केंद्र शासनाने स्वच्छ भारत मिशन ( ग्रामीण ) कार्यक्रमांतर्गत (२२१५ ९८६२ ) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षात अर्थसंकल्पित रु. २५४७२.०७ लाख इतक्या निधीपैकी वितरीत केलेला दुसरा हप्ता रु.२१४१.८८ लाख (रुपये एकवीस कोटी एकेचाळीस लाख अठ्ठयाऐंशी हजार फक्त) निधी या योजनेचे नियंत्रक अधिकारी प्रधान सचिव, पाणी व स्वच्छता विभाग यांना खर्चासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी <u>मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च</u> करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

३. **आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी**. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये.

४. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती सबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

६. उपरोक्त आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२३/अर्थोपाय, दि. ३१-१२-२०१६ अन्वये दिलेल्या मंजूरीस अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०२०२११३२४८७९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.02.03 17:08:54 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
०९. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (पापु-१०) मंत्रालय, मुंबई

११. कक्ष अधिकारी, कार्यासन-१७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. कार्यासन अधिकारी, कार्यासन- २, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.